**मुख्यालय, राज्य राखीव पोलीस बल, गट क्र. १, पुणे, येथे दारुगोळ्याच्या मध्यवर्ती साठ्याकरिता मॅग्झीन इमारतीचे बांधकाम करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पोप्रमा -१०१६/प्र.क्र.६८८/पोल-७,**
२ रा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२.
तारीख: ९ जानेवारी २०१७.

**वाचा -**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.पोमसं/२७-बी/२८-बी-२/मॅग्झीन इमारत बांध. गट क्र. १/४८/२०१४, दिनांक ०२.०४.२०१६.

**शासन निर्णय -**

मुख्यालय, राज्य राखीव पोलीस बल, गट क्र. १, पुणे येथे दारुगोळ्याच्या मध्यवर्ती साठ्याकरिता मॅग्झीन इमारतीचे बांधकाम करण्यासाठी, संदर्भाधीन पत्राद्वारे सादर करण्यात आलेल्या प्रस्तावानुसार रु.६७,०६,५०७/- (रुपये सदुसष्ट लाख, सहा हजार पाचशे सात फक्त), इतक्या खर्चाच्या अंदाजास, उक्त कामासाठी निधी उपलब्ध झाल्याशिवाय बांधकामास सुरुवात करु नये या अटीवर, याद्वारे, प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. उक्त कामासाठी येणारा खर्च हा लेखाशीर्ष ४०७०, इतर प्रशासकीय सेवांवरील भांडवली खर्च, (००) ८००, इतर खर्च, (००)(११), महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माणसाठी बांधकाम करणे, अंतर्गत ५३-मोठी बांधकामे (४०७० ०२११), या उद्दिष्टाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानामधून भागविण्यात यावा

३. हा आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाने अनौपचारीक संदर्भ क्र. ४२६/इमा-२, दिनांक १७.१०.२०१६, अन्वये दिलेल्या सहमतीने आणि शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र २०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उप विभाग-पाच, अनुक्रमांक-१, अनुसार प्रशासनिक विभाग या नात्याने गृह विभागास प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करुन, निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११०११४९४७०६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.01.10 11:53:04 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. राज्यमंत्री, गृह (शहरे), मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री, गृह (ग्रामीण), मंत्रालय, मुंबई.
५. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर पोलीस महासंचालक, राज्य राखीव पोलीस बल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट १, पुणे.
९. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, पुणे.

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
२. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
३. कार्यासन अधिकारी (व्यय-७/विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. निवड फाईल (पोल-७), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.